**डॉ.बाबासाहेब आंबेडकर यांची १२५ व्या जयंती वर्षानिमित्त पिपल्स एज्युकेशन सोसायटी, मुंबई या संस्थेच्या सुभेदार संवादकर विद्यार्थी वसतिगृह, महाड, जि.रायगड या वसतिगृहाच्या बांधकामाकरीता निधी उपलब्ध करुन देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : सान्यावि-२०१९/प्र.क्र.१३९/बांधकामे**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय विस्तार, मुंबई- ४०० ०३२
दिनांक: १० ऑगस्ट, २०२०

वाचा :-

१) शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्र. सान्यावि-२०१५/प्र.क्र. १६३/बांधकामे, दि. ०९.१०.२०१५.
१) विभागाचे पत्र क्र. बैठक-२०१९/प्र.क्र.७३/बांधकामे, दि. २८.०७.२०२० रोजीच्या पत्रा सोबतचे दि.२८.०७.२०२० रोजीच्या बैठकीचे इतिवृत्त.
२) आयुक्त, समाजकल्याण आयुक्तालय, पुणे यांचे पत्र क्र.सकआ/मावक/ऐति.स्थळ/ पिएसोमुसुसंविवम/२०१८-१९/का-१२/३८१६, दिनांक ०१.०३.२०१९.

प्रस्तावना :-

भारतरत्न डॉ.बाबासाहेब आंबेडकर यांच्या १२५ व्या जयंती वर्षानिमित्त संदर्भ क्र. १ येथील शासन निर्णयान्वये निश्चित करण्यात आलेल्या कार्यक्रमातील भाग-१ मधील अनुक्रमांक ६ अनुसार डॉ.बाबासाहेब आंबेडकर यांच्या जीवनाशी निगडीत असलेल्या स्थळांचा विकास करणे, अनुसूचित जाती व नवबौध्द घटकासाठी ऐतिहासिक सांस्कृतिकदृष्ट्या महत्व असलेल्या स्थळांचा विकास करणे या अंतर्गत मा.मंत्री (सा.न्या. व वि.स.) महोदयांच्या अध्यक्षतेखाली गठीत करण्यात आलेल्या समितीच्या दि.२८.०७.२०२० रोजी झालेल्या बैठकीमध्ये पिपल्स एज्युकेशन सोसायटी मुंबई, या संस्थेच्या सुभेदार संवादकर विद्यार्थी वसतिगृह, महाड, जि.रायगड या वसतिगृहाच्या बांधकामाकरीता निधी उपलब्ध करुन देणेबाबतचा प्रस्तावास मान्यता देण्यात आली आहे. संदर्भ क.३ अन्वये आयुक्त, समाजकल्याण आयुक्तालय, पुणे यांच्याकडून प्राप्त झालेल्या कामाच्या रु.१,३६,४०,६०३/- (अक्षरी रुपये एक कोटी छत्तीस लक्ष चाळीस हजार सहाशे तीन फक्त) इतक्या रकमेच्या प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय:-

भारतरत्न डॉ.बाबासाहेब आंबेडकर यांच्या १२५ व्या जयंतीनिमित्त पिपल्स एज्युकेशन सोसायटी, मुंबई या संस्थेच्या सुभेदार संवादकर विद्यार्थी वसतिगृह, महाड, जि.रायगड या वसतिगृहाच्या बांधकामाकरीता निधी उपलब्ध करुन देणेच्या कामास १,३६,४०,६०३/- (अक्षरी रुपये एक कोटी छत्तीस लक्ष चाळीस हजार सहाशे तीन फक्त) इतक्या रकमेच्या खर्चास पुढील अटींच्या अधीन राहून या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

१) सदर कामाची कार्यान्वयिन यंत्रणा सार्वजनिक बांधकाम विभाग राहील.
१) काम सुरु करण्यापूर्वी नमुना नकाशा, मांडणी नकाशा तसेच विस्तृत नकाशास वास्तुविशारदांकडून मंजूरी घेऊनच सुरु करावे

२) ढोबळ स्वरुपात धरण्यात आलेल्या तरतूदीबाबत काम करतेवेळी विस्तृत अंदाजपत्रक करुन काम हाती घ्यावे.

३) प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय क्र. इएनव्ही-२०१३/ प्र.क्र.१७७/तां.क.१. दि. १० जानेवारी, २०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वांनुसार कार्यवाही करण्यात यावी.

४) सार्वजनिक बांधकाम विभागाच्या शासन निर्णय क्रमांक बीडीजी २०१७/प्र.क्र.६०/ इमारती-२, दि.७/७/२०१७ अन्वये कार्यवाही करण्यात यावी.

५) काम सुरु करण्यापुर्वी प्रस्तावित कामाच्या अंदाजपत्रकावर मुख्य अभियंता सार्वजनिक बांधकाम विभाग, यांचे साक्षांकन घेणे आवश्यक राहिल.

२. यावर होणारा खर्च मागणी क्र. एन-३, मुख्य लेखाशिर्ष २२२५- अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती व इतर मागासवर्ग व अल्पसंख्यांक यांचे कल्याण, ०१, अनुसूचित जातीचे कल्याण, ७८९- अनुसूचित जाती घटक योजना, ०२- भारतरत्न डॉ.बाबासाहेब आंबेडकर यांची १२५ वी जयंती साजरी करणे, (योजनांतर्गत-दत्तमत) लेखाशिर्ष- २२२५ डी८२३ या लेखाशिर्षाखाली खर्ची घालून तो सन २०२०-२१ या वित्तीय वर्षात करण्यात आलेल्या अर्थसंकल्पीय तरतूदीमधून भागविण्यात यावा.

३. या करीता आयुक्त,समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत असून, त्यांनी या कामासाठीचा निधी आहरित करुन तो विहित कार्यपध्दतीनुसार कार्यकारी अभियंता इलाखा शहर, मुंबई यांना वितरित करावा.

४. प्रस्तुतचा शासन निर्णय, दि.९/१०/२०१५ च्या शासन निर्णयान्वये गठित समितीस प्राप्त अधिकार तसेच वित्त विभाग क्र.विअप-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम/भाग-२, दि.१७/४/२०१५, शासन निर्णय वित्त विभाग, क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम (भाग-२), दि.२०/०९/२०१९ व शासन परिपत्रक सार्वजनिक बांधकाम विभाग, क्र.संकीर्ण-२०१९/प्र.क्र. १०/इमा-२, दि.२५/०९/२०१९ अन्वये रु.१५.०० कोटी पर्यंतच्या किरकोळ व नागरी बांधकामास प्रशासकीय मान्यता देण्याचे अधिकार प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांच्या अधीन राहून निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२००८१०१७०२५५८९२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षाकिंत करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Anil Kondaji Ahire

Digitally signed by Anil Kondaji Ahire
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Social Justice And Special Assistance, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9004dcdaa635070d60922aaa5dec8888d343a473567 98e6c9cf27e4353d60e51, serialNumber=fd9b93035f4da174c04fa71634fe1f6aa493c78a 5335f985651f937888df7a89, cn=Anil Kondaji Ahire
Date: 2020.08.10 17:14:32 +05'30'

**(अ.कों. आहिरे)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रत,**

१. मा.मंत्री (सा.न्या.) महोदयांचे खाजगी सचिव
२. मा. राज्यमंत्री (सा.न्या.) महोदयांचे खाजगी सचिव
३. सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग,मंत्रालय,मुंबई
४. आयुक्त, समाजकल्याण, पुणे

५. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग,मर्झबान रोड, मुंबई.
६. अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, मुंबई.
७. प्राचार्य, पिपल्स एज्युकेशन सोसायटी,मुंबई चे सुभेदार संवादकर विद्यार्थी वसतिगृह, महाड जि. रायगङ
८. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम इलाखा शहर बांधकाम विभाग, ओल्ड कस्टम हाऊस , मुंबई.
९. महालेखापाल महाराष्ट्र १/२ (लेखापरीक्षा / लेखाअनुज्ञेयता), मुंबई/नागपूर.
१०. प्रादेशिक उपायुक्त, समाजकल्याण विभाग,मुंबई.
११. सहायक आयुक्त, समाजकल्याण, मुंबई शहर.
१२. जिल्हा कोषागार अधिकारी, मुंबई शहर/पुणे/रायगड
१३. निवडनस्ती.